**जिल्ह्यातील अंमली पदार्थांच्या वापराला आळा घालण्यासाठी “जिल्हास्तरीय अंमली पदार्थ विरोधी कार्यकारी समिती” ची स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक- संकिर्ण-०१२२/प्र.क्र.०६/विशा-३अ**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक -२५ मार्च २०२२

संदर्भ-अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अ.शा.पत्र क्र.५४/अपोमसं/दविप/म.रा./२०२१, दि.२३.१२.२०२१.

**परिपत्रक-**

राज्यामध्ये जिल्हा तसेच तालुका पातळीवर आढळणाऱ्या अंमली पदार्थांचे सेवन व वापर याच्यासंदर्भात परिणामकारक प्रतिबंधात्मक कार्यवाही करण्याची आवश्यकता आहे. यानुषंगाने राज्यातील जिल्हास्तरावरील अंमली पदार्थांच्या वापरावर आळा घालण्यासाठी तसेच क्षेत्रीय स्तरावरील अंमली पदार्थांबाबतची समस्या प्रभावीपणे हाताळण्यासाठी पुढीलप्रमाणे “जिल्हास्तरीय अंमली पदार्थ विरोधी कार्यकारी समिती” गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | पोलीस आयुक्त/जिल्हा पोलिस अधीक्षक | अध्यक्ष |
| २. | सीमा शुल्क/केंद्रीय वस्तू व सेवा कर विभागाचे कार्यक्षेत्रिय सहायक आयुक्त/ उप आयुक्त | सदस्य |
| ३. | निवासी उप जिल्हाधिकारी (मुंबई शहर जिल्हा) /उपविभागीय दंडाधिकारी (उर्वरीत महाराष्ट्र) | सदस्य |
| ४. | जिल्हा शल्यचिकित्सक | सदस्य |
| ५. | नार्कोटीक्स कंट्रोल ब्युरोचे (NCB) अधीक्षक (संबंधित जिल्हा अधिकारक्षेत्र) | सदस्य |
| ६. | सहायक आयुक्त (औषधे) | सदस्य |
| ७. | अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क | सदस्य |
| ८. | जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| ९. | टपाल विभागाचे जिल्हास्तरीय प्रतिनिधी | सदस्य |
| १०. | जिल्हा माहिती अधिकारी | सदस्य |

२. या समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील-

१) जिल्ह्यातील अंमली पदार्थ विरोधी कारवाईचा नियमित आढावा घेणे.
२) जिल्ह्यात खसखस किंवा गांजा पिकांची अवैध लागवड होणार नाही याची दक्षता घेणे.

३) Darknet व Courier च्या माध्यमातून अंमली पदार्थांची मागणी व पुरवठा होणार नाही याबाबत लक्ष ठेवणे.

४) व्यसनमुक्ती केंद्रांमध्ये व्यसनमुक्तीसाठी दाखल झालेल्या व्यक्तिंची संख्या व त्यांना कोणत्या अंमली पदार्थांचे व्यसन आहे याबाबत माहिती प्राप्त करणे.

५) Drug Detection Kit व Testing Chemicals यांची उपलब्धता सुनिश्चित करणे.

६) जिल्हास्तरावर अंमली पदार्थांच्या दुष्परिणामांबाबत जनजागृती अभियान राबविणे.

७) जिल्हा पोलिस, NCB व राज्य उत्पादन शुल्क विभाग यांनी केलेल्या कारवायांची माहिती संकलित करून त्याबाबतचा Database तयार करणे.

८) एन.डी.पी.एस. अंतर्गत गुन्हयाचे तपासी अधिकारी यांच्याकरीता प्रशिक्षण आयोजित करणे.

९) जिल्हयामध्ये अस्तित्वात असलेल्या रासायनिक कारखान्यांमध्ये कोणत्याही प्रकारच्या अंमली पदार्थांचे उत्पादन होणार नाही याची दक्षता घेणे. तसेच जे कारखाने बंद आहेत त्यावर विशेष लक्ष ठेवणे.

३. सदर समितीची बैठक प्रत्येक महिन्याला आयोजित करण्यात यावी.

४. अपर पोलिस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य हे राज्यामध्ये अंमली पदार्थांबाबतचे केंद्रस्थ अधिकारी असून ते जिल्हास्तरीय कार्यकारी समितीच्या कामकाजावर लक्ष ठेवतील. तसेच सर्व पोलिस आयुक्त व जिल्हा पोलिस अधीक्षक हे सदर जिल्हास्तरीय अंमली पदार्थ विरोधी कार्यकारी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त अपर पोलिस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना पाठवतील. तसेच सदर इतिवृत्ताची एक प्रत जिल्हास्तरीय नार्कोकॉर्डिनेशन सेंटर (Narco Co-ordination Center -NCORD) समितीस पाठवतील.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०३२५१५४९२४७३२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIRUDDHA V JEWLIKAR

Digitally signed by ANIRUDDHA V JEWLIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=29c6c42b5811a121a201ecd7aceaac3251c7d1ded31ff1b6e1a88d86b600c6bd, pseudonym=A29ED764E36FC94AB894683327375533A01AD102, serialNumber=B986D51C7C29938C2BBB53D563F07DFC61C84B730CB9118407ECAB6A27C67C4C, cn=ANIRUDDHA V JEWLIKAR
Date: 2022.03.28 12:47:59 +05'30'

**(अनिरुध्द जेवळीकर)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव

२) मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव

३) मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव

४) मा.राज्यमंत्री (गृह-शहरे) यांचे खाजगी सचिव

५) मा.राज्यमंत्री (गृह-ग्रामीण) यांचे खाजगी सचिव

६) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) अपर पोलिस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य,मुंबई
८) सर्व पोलिस आयुक्त/ सर्व जिल्हा पोलिस अधीक्षक
९) सहायक आयुक्त/उप आयुक्त, सीमा शुल्क विभाग
१०) सहायक आयुक्त/उप आयुक्त, वस्तू व सेवा कर विभाग
११) निवासी उपजिल्हाधिकारी, मुंबई शहर
१२) सर्व उपविभागीय दंडाधिकारी
१३) सर्व जिल्हा शल्यचिकित्सक
१४) सर्व अधीक्षक, नार्कोटीक्स कंट्रोल ब्युरो (NCB)
१५) सहाय्यक आयुक्त (औषधे), महाराष्ट्र राज्य,मुंबई
१६) सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य,मुंबई
१७) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी
१८) सर्व जिल्हास्तरीय प्रतिनिधी, टपाल विभाग
१९) सर्व जिल्हा माहिती अधिकारी
२०) अ.मु.स.(गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२१) अ.मु.स.(अ. व सु.) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२२) उप सचिव (विशा-३अ), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२३) निवडनस्ती/विशा-३अ